**मानव विकास मिशनच्या कार्यक्षेत्रातील**
**तालुक्यांसाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
ज्ञापन क्र.ममावि २००९/प्र.क्र.७५ /का.१४८३
मत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० सष्टेंबर ,२००९

**वाचा:-** १) क्रमांक :ममावि२००६/प्र.क्र.२०/का.१४१३ दि.२९ जून २००६.
२) क्रमांक :ममावि२००९/प्र.क्र.४१/का.१४८३ दि.१७ जुलै २००९.

**ज्ञापन :-**

महाराष्ट्र राज्याचा पहिला मानव विकास अहवाल सन-२००२ मध्ये प्रसिद्ध झाला. हा अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतर, राज्यातील परभणी, हिंगोली, जालना, उस्मानाबाद, नांदेड, नंदूरबार, धुळे, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली या १२ अतिमागासलेल्या जिल्ह्यातील २५ तालुक्यांमध्ये मानव विकास निर्देशांक वाढविण्याकरिता योग्य त्या उपाययोजना करणे/त्याची अंमलबजावणी करुन घेणे याकरिता दिनांक २९/६/२००६ च्या शासन आदेशान्वये महाराष्ट्र मानव विकास मिशन गठीत करण्यात आले आहे. सदर मिशनमार्फत उपरोक्त तालुक्यांसाठी अतिरिक्त निधी देऊन मानव विकास निर्देशांक उंचावण्यासाठी विविध विकास योजना राबविण्यांत येत आहेत. सदर निधीतून राबवावयाच्या योजनांच्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याची आवश्यकता आहे असे कार्याध्यक्ष, मानव विकास मिशन यांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. त्यास अनुसरुन चांगली सेवा पुरवून परिणामकारक यश प्राप्त होण्यासाठी पध्दती सुलभ करुन त्यानुसार निधी वितरीत करण्याचे प्रस्तावित आहे.

**निधीचे वाटप:-**

सन २००९-१० या आर्थिक वर्षामध्ये उपरोक्त १२ अतिमागासलेल्या जिल्हयातील २५ तालुक्यांमध्ये मानव विकास निर्देशांक वाढविण्यासाठीच्या योजना राबविण्यासाठी रु.६०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे. सदर निधीपैकी मानव विकास मिशन कार्यालयास त्यांना विहित केलेल्या जबाबदा-या पार पाडण्यासाठी यापूर्वीच्या पध्दतीप्रमाणे रु.१०.०० कोटी निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BDS) वितरीत करण्यात येईल. त्यांनी तो दिनांक २९ जून २००६ च्या शासन निर्णयातील पध्दतीनुसार अहरीत करून आपल्या खात्यामध्ये जमा करावयाचा आहे.

२.	उर्वरित  रु.५०.०० कोटी निधी प्रत्येक तालुक्याला रु.२.०० कोटी याप्रमाणे (प्रपत्र-अ) अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BDS) मानव विकास मिशनला वितरीत करण्यात येत आहे. मानव विकास मिशनने सदरचा निधी  संबंधित जिल्हयांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे (BDS) वितरीत करावयाचा आहे. या निधीतून राबविण्यात येणाऱ्या योजनांना जिल्हा योजनांप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना असतील. मात्र तांत्रिक मान्यता संबंधित विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांने द्यावयाची आहे.

३.	मानव विकास मिशन यांनी त्यांना दिलेल्या  १० कोटी निधी खालील बाबींवर खर्च करावा:-

अ) मानव विकास मिशन अंतर्गत नियुक्त केलेल्या सर्व कर्मचा-यांचे वेतन व भत्ते,

ब) योजनांचे मुल्यमापन, अभ्यास व अहवाल तयार करणे,

क) अधिकारी/कर्मचा-यांचे प्रशिक्षण

ड) २५ तालुक्यातील मानव विकास निर्देशांक सुधारण्यासंबंधीच्या नाविण्यपुर्ण योजना (Innovative Scheme) या बाबीवर खर्च करावयाचा आहे.

४.	Innovative किंवा नवीन योजना म्हणजेच जी योजना यापूर्वी कुठल्याही स्त्रोतातून घेण्यात आलेली नसेल.  सदरची योजना मानव विकास अंतर्गत काही ठराविक जिल्हे किंवा तालुक्यांसाठी ठराविक कालावधीसाठीच म्हणजे एक किंवा दोन वर्षापर्यंतच राबविण्यात यावी. एक किंवा दोन वर्षात त्या योजनेचे झालेले परिणाम यांचे मुल्यामापन केल्यानंतर सदरची योजना पुढे चालू ठेवावयाची आहे किंवा कसे याबाबत पुढील निर्णय घेण्यात येईल.या शिर्षाखाली मंजूर केलेल्या योजनांबाबत मानव विकास मिशनने शासनाला वेळोवेळी अवगत करावे.

५.	मानव  विकास मिशन अंतर्गत राबवावयाच्या योजना प्रामुख्याने अशा असल्या पाहिजेत की ज्या राबविल्यावर मानव विकासाच्या कुठल्याही घटकावर म्हणजेच शिक्षण, आरोग्य किंवा उत्पन्नात वाढ  यावर थेट परिणाम होईल. यामुळे शासनाकडे प्रस्ताव पाठविताना  जिल्हाधिकारी यांनी खालील बाबी तपासाव्यात :-

(i) शिक्षण, आरोग्य तसेच भौतिक सुविधा (Physical Infrastructure) विक्षित करण्यासाठी केंद्र शासनाचे महत्वाकांक्षी कार्यक्रमांतर्गत ( सर्व शिक्षा अभियान , राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन, प्रधान मंत्री ग्राम सडक योजना इत्यादी)   आवश्यक निधी उपलब्ध असल्यामुळे मानव विकास मिशन अंतर्गत योजना घेतांना केंद्र शासनाच्या योजनांतर्गत ती घेणे शक्य नसेल किंवा त्या योजनेचा इतर घटकांपर्यंत  लाभ वाढवावयाचा असेल तर ती घेण्यास हरकत नाही.

(ii) शिक्षणामध्ये सर्व शिक्षा अभियान आणि आरोग्यामध्ये राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशनसारखे महत्वाकांक्षी कार्यक्रम असल्यामुळे काही प्रमाणात शिक्षण आणि आरोग्य या घटकामध्ये

मानव विकास साध्य झालेला आहे. मात्र उत्पन्नवाढ या घटकामध्ये तेवढया प्रमाणात यश मिळालेले नाही.सबब मानव विकास मिशनमार्फत प्रामुख्याने उत्पन्न वाढीच्या योजना राबविणे आवश्यक आहे.

(iii) व्यक्तीगत अनुदानाच्या योजना घेता येणार नाहीत. तसेच ज्या योजनेचा लाभ फक्त काही ठराविक लोकांना होणार असेल अशा योजना या निधीतून घेण्यात येऊ नये. (गाई/म्हशींचे गटवाटप, शेततळे/को.प.बंधारे इ.) परंतु गावात सर्वसाधारण जनतेला उत्पन्न वाढविण्यास मदत मिळेल अशा योजना घेण्यास हरकत नाही.

**६.** जिल्हाधिकारी यांनी त्यांना दिलेल्या रू. ५०.०० कोटी निधीतून सोबत जोडलेल्या मार्गदर्शक यादीतील (प्रपत्र-ब) योजना राबवावयाच्या आहेत. या यादी शिवाय कुठल्या योजनांवर निधी खर्च करावयाचा असेल तर जिल्हाधिकारी यांनी मानव विकास मिशनमार्फत नियोजन विभागाची पूर्व परवानगी घ्यावी.

**७.** निधीचे वितरण जिल्हाधिकारी यांनी अंमलबजावणी करणा-या आहरण व संवितरण अधिका-याच्या नावाने अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर करावे.

**८.** या योजनेखाली अंमलबजावणी यंत्रणांनी जिल्हाधिकारी मार्फत मान्यताप्राप्त प्रकल्पाकरिता शेवटच्या पुरवठादाराला /लाभार्थ्यांना रक्कम अदा करतेवेळी कोषागारातून निधी काढणे आवश्यक आहे. तसेच अंमलबजावणी यंत्रणेने स्वतः च्या निधीतून खर्च केला असेल तर कोषागारातून खर्च केलेल्या निधीच्या प्रतिपूर्तीसाठी निधी काढता येईल. परंतु कोणत्याही परिस्थितीत अंमलबजावणी यंत्रणेमार्फत कोषागारातून अग्रिम स्वरुपात निधी काढून स्वतःच्या बँक /पीएलए खात्यात निधीत ठेवणे अनुज्ञेय नाही. मात्र ग्रामपंचायतीमार्फत केले जाणारे कामाबाबत त्यांना अग्रीम देणे व ठराविक कालावधीत त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र घेता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ.निपुण विनायक )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रतः-

१) कार्याध्यक्ष, मानव विकास मिशन, औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी, जालना/परभणी/हिंगोली/नांदेड/उस्मानाबाद/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली/बुलढाणा/वाशिम /धुळे/नंदूरबार ,

प्रति,

१) मा. मंत्री/राज्यमंत्री , नियोजन यांचे खाजगी सचिव,
२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
४) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
५) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
६) शासनाचे मुख्य सचिव,
७) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८) विभागीय आयुक्त , औरंगाबाद/अमरावती/नागपूर/नाशिक/ विभाग,
९) विशेष कार्य अधिकारी, नियोजन, विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद/अमरावती/नागपूर/नाशिक विभाग.
१०) जिल्हा नियोजनअधिकारी,जालना/परभणी/हिंगोली/नांदेड/उस्मानाबाद/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली /बुलढाणा/ वाशिम /धुळे/नंदूरबार ,
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन, मुंबई,
१३) जिल्हा कोषागार अधिकारी , ाालना/परभणी/हिंगोली/नांदेड/उस्मानाबाद/यवतमाळ/चंद्रपूर/गडचिरोली /बुलढाणा/ वाशिम /धुळे/नंदूरबार ,
१४) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती/का.१४८३

**प्रपत्र-अ**

**तालुक्यांची यादी**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | वितरीत करावयाचा निधी (रू. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | **धुळे** | साक्री | 200 |
| | | शिरपुर | 200 |
| २ | **नंदुरबार** | अक्कलकुवा | 200 |
| ३ | **जालना** | | 200 |
| | | मंठा | 200 |
| ४ | **परभणी** | पालम | 200 |
| | | जिंतुर | 200 |
| ५ | **हिंगोली** | सेनगाव | 200 |
| ६ | **नांदेड** | भोकर | 200 |
| | | हिमायतनगर | 200 |
| ७ | **उस्मानाबाद** | उस्मानाबाद | 200 |
| | | कळंब | 200 |
| | | वाशी | 200 |
| | | भूम | 200 |
| | | तुळजापुर | 200 |
| ८ | **बुलढाणा** | जळगाव जामोद | 200 |
| | | संग्रामपुर | 200 |
| ९ | **वाशिम** | मंगळुरपीर | 200 |
| | | मानोरा | 200 |
| १० | **यवतमाळ** | घाटंजी | 200 |
| | | झरीजामणी | 200 |
| ११ | **चंद्रपुर** | राजुरा | 200 |
| | | जिवती | 200 |
| १२ | **गडचिरोली** | कुरखेडा | 200 |
| | | धानोरा | 200 |
| | | **एकुण** | **5,000** |
| | | | |

## प्रपत्र-ब

## मानव विकास मिशनने राबवावयाच्या योजनांची यादी

**अ) उत्पन्न वाढ**

१) सर्व प्रकारची व्यावसायीक प्रशिक्षण
२) ITI मध्ये कमी कालावधीचे प्रशिक्षण अभ्यासक्रम सुरु करण्याकरिता आवश्यक हत्यारे, उपकरणे व सुविधा निर्माण करणे.
३) पोलीस भरतीसाठी व इतर शासकीय सेवा भरतीसाठी प्रशिक्षण,
४) किशोरवयीन मुलींना व्यावसायिक प्रशिक्षण
५) महिला बचत गटांना व्यावसायिक प्रशिक्षण

**ब) आरोग्य**
( राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन व अन्य आरोग्य कार्यक्रमांतर्गत घेता न येणाऱ्या मर्यादेपर्यन्त)
१) संस्थात्मक प्रसुतिसाठी प्रोत्साहन देणे.
२) किशोरी प्रशिक्षण कार्यक्रम
३) अंगणवाडी बांधकाम
४) किशोरवयीन मुली, गरोदर माता , नवजात बालक यांच्या आरोग्यासाठी विविध कार्यक्रम. (प्रशिक्षण,औषध/साहित्य पुरवठा किंवा इतर आवश्यक बाबी)

**क) शिक्षण**
( सर्वशिक्षा अभियान व अन्य शिक्षण योजनांतर्गत घेता न येणाऱ्या मर्यादेपर्यन्त)
१) शाळा तेथे ग्रंथालय,
२) मुलींना १२ वी पर्यत शिक्षणासाठी प्रवृत्त करणे.
३) प्राथमिक व माध्यमिक शाळेतील मुलींना सायंकली पुरविणे.(ग्राम शिक्षण समितीस देणे)
४) शाळांसाठी बाके खरेदी
५) शाळा तेथे प्रयोगशाळा

**ड) कर्मचारी प्रोत्साहन योजना**
१) अंगणवाडया/आरोग्य केंद्र/उपकेंद्र यांचे मुल्यमापन करुन चांगले काम करणाऱ्या संस्थांना त्याना हवे असलेले साहीत्य देणे व कर्मचाऱ्यांचा सत्कार करणे.
२) उत्कृष्ट शाळांना (ज्यांनी शिष्यवृत्ती परिक्षेत चांगले यश प्राप्त केले आहे) यांचे मुल्यमापन करुन चांगले काम करणाऱ्यांना शाळांना हवे असलेले साहित्य पुरविणे व शिक्षकांचा सत्कार करणे.